**राज्यात गत वर्षांमध्ये विविध योजनेंतर्गत झालेल्या मृदसंधारण व जलसंधारण कामांची प्रत्यक्ष स्थळ पडताळणी (Ground Truthing) करणाऱ्या पथक प्रमुखांना मोबाइल इंटरनेटवर होणारा खर्च देणेबाबत.**




**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र.- जशिअ-२०२५/प्र.क्र.१२/जल-७**
**दालन क्र.७१२, विस्तार इमारत, ७ वा मजला,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक: १३ मे, २०२५**

**वाचा:-**

**शासन निर्णय क्र.- जशिअ-२०२५/प्र.क्र.१२/जल-७, दिनांक: १२ मार्च, २०२५**

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यात गत वर्षात विविध विभागांमार्फत विविध योजनांतर्गत पाणलोट क्षेत्रात झालेल्या मृद व जलसंधारण कामांचे/ संरचनांचे Asset Mapping आणि प्रत्यक्ष स्थळ पडताळणी (Ground Truthing) करणेबाबत शासन निर्णय दि.१२ मार्च, २०२५ अन्वये मार्गदर्शक सूचना निर्गमीत करण्यात आल्या आहेत. सदर कार्यक्रम माहे मे-२०२५ पर्यंत पूर्ण करावयाचा असून सदर कार्यक्रमामुळे उपलब्ध होणाऱ्या माहितीआधारे जलयुक्त शिवार अभियानाचे प्रभावीपणे नियोजन करण्यास मदत होणार आहे.

२. सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने सर्व जिल्ह्यांमध्ये **गावनिहाय पथक प्रमुखांची** नेमणूक करून प्रत्यक्ष शिवार फेरीची सुरूवात झालेली आहे. प्रत्यक्ष स्थळ पडताळणी (Ground Truthing) करताना MRSAC, नागपूर यांनी विकसित केलेले मोबाइल ॲप जिपीएस सहित वापरण्यासाठी High Speed Mobile Internet ची आवश्यकता आहे. त्यासाठी पथक प्रमुख म्हणून नेमण्यात आलेल्या अधिकारी/ कर्मचारी यांना मोबाइल इंटरनेटसाठीचा खर्च स्वत: करावा लागत असल्याने मोबाईल इंटरनेटपोटी होणारा खर्च देणेबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

ज्या गावांमध्ये प्रत्यक्ष स्थळ पडताळणी करावयाच्या मृदसंधारण व जलसंधारण संरचनांची संख्या **२०० किंवा २०० पेक्षा कमी आहे, त्या गावांकरिता प्रति गाव रु.१०००/-** आणि ज्या गावांमध्ये प्रत्यक्ष स्थळ पडताळणी करावयाच्या मृदसंधारण व जलसंधारण संरचनांची संख्या **२०० पेक्षा जास्त आहे, त्या गावांसाठी प्रति गाव रु.२०००/-** इतका मोबाइल इंटरनेटसाठीचा खर्च **पथक प्रमुख** यांना देणेबाबत शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त प्रकरणी येणारा खर्च जलयुक्त शिवार अभियान २.० अंतर्गत क्षेत्रिय स्तरावरील मंजूर प्रशासकिय मान्यता प्राप्त कामांसाठी असलेल्या आकस्मिक खर्च (Contingency charges) या बाबीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२५०५१३११४७०००८१८२६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DEVENDRA PANDIT BHAMARE
Date: 2025.05.13 11:48:10 +05'30'

**(देवेंद्र भामरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. मंत्री, मृद व जलसंधारण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा. मंत्री, कृषी यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
११) सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य.
१२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१३) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) - १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१५) सर्व विभागीय आयुक्त,
१६) आयुक्त (कृषी), पुणे.
१७) आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर.
१८) मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा, पुणे.
१९) सर्व जिल्हाधिकारी,
२०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२१) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालकपुणे ,महाराष्ट्र राज्य ,सामाजिक वनीकरण ,.
२२) महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), छत्रपती संभाजीनगर.
२३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (प्रसिद्धी करिता).
२४) आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
२५) आयुक्त, मनरेगा, नागपूर.

२६) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२७) संचालक, फलोत्पादन, पुणे.
२८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
२९) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
३०) संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर.
३१) सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी,
३२) सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग,
३३) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, कृषी विभाग,
३४) सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो),
३५) सर्व उप विभागीय अधिकारी (प्रांत),
३६) सर्व कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा), जिल्हा परिषद,
३७) सर्व उप वनसंरक्षक, वन विभाग,
३८) सर्व वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा.
३९) सर्व विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग.
४०) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग,
४१) सर्व संबंधित उप विभागीय अभियंता, पाणी पुरवठा विभाग,
४२) सर्व संबंधित उप विभागीय अभियंता, जलसंपदा विभाग,
४३) सर्व तालुका कृषी अधिकारी, कृषी विभाग,
४४) सर्व उप विभागीय जलसंधारण अधिकारी, जि.प. ल.पा,
४५) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे / छत्रपती संभाजीनगर,
४६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
४७) सर्व सह सचिव/उप सचिव / अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.